महाराष्ट्र मत्स्यसेवा - सहाय्यक आयुक्त
मत्स्यव्यवसाय/ प्रकल्प व्यवस्थापक, दापचरी (तांत्रिक)
गट-अ (जाहिरात क्र.०३/२०२०) या पदावर सरळसेवेने
नियुक्ती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्र.मत्स्यआ२०२३/प्र.क्र.१४५/पदुम-१२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११ मार्च, २०२४

**वाचा:-** १. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.एडीआर-२९२३/प्र.क्र.१०५/२०२३/एकोणीस, दिनांक ३.११.२०२३
२. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, अधिसूचना दिनांक ६ जुलै, २०१३.
३. सा.प्र.वि. अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२,दि.१४.७.२०२१

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन क्र.१ च्या पत्रान्वये महाराष्ट्र मत्स्यसेवा गट-अ संवर्गात सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय/ प्रकल्प व्यवस्थापक, दापचरी (तांत्रिक) या पदांकरीता १७ उमेदवारांची शिफारस केली आहे. मत्स्यव्यवसाय विभागात सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय/ प्रकल्प व्यवस्थापक, दापचरी (तांत्रिक) गट-अ संवर्गातील रिक्त पदे तातडीने भरण्याच्या दृष्टीने जात वैधता प्रमाणपत्र व नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र अहवाल प्राप्त होण्याच्या अधीन राहून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार संबंधित उमेदवारांना सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय/ प्रकल्प व्यवस्थापक, दापचरी (तांत्रिक) गट-अ या पदावर तात्पुरती नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या १७ उमेदवारांची मत्स्यव्यवसाय विभागात सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय/ प्रकल्प व्यवस्थापक, दापचरी (तांत्रिक) महाराष्ट्र मत्स्यसेवा गट-अ (सातव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी एस-२०: रु. ५६१००-१७७५००) या पदावर जात वैधता प्रमाणपत्र व नॉन क्रिमी लेअर प्रमाणपत्र इ. बाबींची पूर्तता व पडताळणी करण्याच्या अधीन राहून महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ मधील नियम-९ (४३) मध्ये विहित केलेल्या परिविक्षाधीन या संज्ञेच्या व्याख्येनुसार केवळ तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

२. नियुक्ती अधिकाऱ्यांची नावे व पदस्थापनेचे ठिकाण खालीलप्रमाणे आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | मूळ प्रवर्ग | महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे ज्या प्रवर्गातून शिफारस केली तो प्रवर्ग | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १. | श्री. शुभम येलेश्वर कोमरेवार | NT-B Sports | Open-General-1 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), नागपूर. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २. | श्री. जयेश जगन्नाथ बळकटे | Open | Open General-2 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक ), धुळे. |
| ३. | श्रीमती अर्चना बाळासाहेब दुरगुडे | Open | Open-General-3 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), पुणे. |
| ४. | श्रीमती दिपाली संजीव बांदकर | Open | Open-General-4 | प्रकल्प व्यवस्थापक (तांत्रिक), दापचरी. |
| ५. | श्रीमती ऐश्वर्या भूषण रणदिवे | Open | Open General-5 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), मुंबई उपनगर. |
| ६. | श्री. अतुल राजेंद्र पाटील | OBC | OBC General-1 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), जळगांव. |
| ७. | श्री. समीर जयसिंग डोंगरे | SC | SC- General-1 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), गडचिरोली. |
| ८. | श्री. सागर विजय कुवेसकर | OBC | OBC-General-2 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, गट-अ (तांत्रिक), सिंधुदुर्ग-मालवण. |
| ९. | श्री. स्वप्नील गोपाळ वालदे | SC | SC- General-2 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), वर्धा. |
| १०. | श्रीमती तेजस्विनी प्रदीप करळे | Open Female | Open-Female-1 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), लातूर. |
| ११. | श्री. श्रवण उध्दवराव व्यवहारे | OBC | OBC-General-3 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), हिंगोली. |
| १२. | श्री. विक्रम चतुर्भुज कच्छवे | DT-A | DT-A General-1 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), नांदेड. |
| १३. | श्रीमती प्रियांका राजेश झोड | OBC Female | Open-Female-2 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), वाशिम. |
| १४. | श्री. कैलाश तुकाराम मारबते | NT-B | NT-B General-1 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), गोंदिया. |
| १५. | श्रीमती पल्लवी केशव पाखमोडे | OBC Female | OBC-Female-1 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), भंडारा. |
| १६. | श्रीमती मधुरिमा अनंत जाधव | SC Female | SC- Female-1 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), छत्रपती संभाजीनगर. |
| १७. | श्री. मॉन्टी मदन मेश्राम | ST | ST-General-1 | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, (तांत्रिक), अमरावती. |

३. वरील उमेदवारांची महाराष्ट्र मत्स्यसेवेतील सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय/ प्रकल्प व्यवस्थापक, दापचरी गट-अ (तांत्रिक) मधील नियुक्ती ही कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विभाग व मत्स्यव्यवसाय विभागाच्या दिनांक २२.०८.२०१९ च्या सेवाप्रवेश नियमानुसार, २ वर्षाचा परिविक्षाधिन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या व खालील विहित अटी व शर्तीच्या अधीन तात्पुरत्या स्वरुपात असेल.

१) महाराष्ट्र नागरी सेवा ( ज्येष्ठतेचे विनियमन ) नियमावली १९८२ व त्यामध्ये वेळोवेळी करण्यात येणाऱ्या सुधारणांच्या अधीनतेने त्यांची ज्येष्ठता राहील.

२) उपरोक्त उमेदवारांना तात्पुरती नियुक्ती त्यांचे जात वैधता प्रमाणपत्र अहवाल व नॉन क्रिमी लेअर प्रमाणपत्र अहवाल प्राप्त होण्याच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

३) वरील सर्व उमेदवारांची त्याच्या नियुक्तीच्या पदावर नियुक्तीच्या आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत रुजू व्हावयाचे आहे. या कालावधीत उमेदवारांनी नियुक्ती स्वीकारली नाही तर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने घेतलेल्या स्पर्धा परिक्षेतील गुणानुक्रमानुसार त्यांना ज्येष्ठता मिळणार नाही व त्यांचे नाव कोणतीही पूर्वसुचना न देता या विभागाच्या/महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निवडसुचीतून कमी करण्यात येईल. काही अपरिहार्य कारणास्तव त्यांना रुजू होण्यास मुदतवाढ हवी असल्यास तसे सकारण लेखी कळवून मुदतवाढ घेणे आवश्यक आहे.

४) उपरोक्त प्रमाणे नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांनी सेवा प्रवेश नियमानुसार विभागामार्फत आयोजित केल्या जाणाऱ्या विभागीय परीक्षा, प्रादेशिक भाषा परीक्षा, संगणक परीक्षा विहित मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. तसेच विहित नियमानुसार विभागांतर्गत, शासन व महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत वेळोवेळी आयोजित करण्यात येणाऱ्या इतर परीक्षा परिविक्षा कालावधीच्या २ वर्षाच्या विहित मुदतीत उत्तीर्ण होणेही आवश्यक राहतील.

५) परिविक्षाधिन अधिकाऱ्याने कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा नियमानुसार उत्तीर्ण होणे आवश्यक असलेल्या विभागीय परिक्षा विहित मुदतीत परिविक्षा कालावधीत उत्तीर्ण न केल्यास अथवा त्यांची वर्तणूक अयोग्य, संशयास्पद आढळल्यास तो/ ती कोणतीही पूर्वसुचना न देता सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

६) उपरोक्तपैकी जे उमेदवार त्यांच्या सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असतील त्यांनी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि.०२.१२.१९९७ मधील तदतुदीनुसार शासनास किमान १ (एक) महिन्याची पूर्वसूचना देणे किंवा पुर्वसूचनेऐवजी १ महिन्याचे वेतन शासनाकडे भरणा करणे आवश्यक राहील. तसेच या उमेदवारांची सेवा समाप्त करावयाची असेल त्यावेळी शासनाकडूनही अशी एक महिन्यांची पूर्वसूचना संबंधीत अधिकाऱ्यांस दिली जाईल. मात्र, गैरशिस्त, सेवा नियमांचा भंग इ. कारणासाठी सेवा समाप्त करताना वरील उमेदवारांना नोटीस देण्याचे शासनास बंधनकारक राहणार नाही. हे नोटीशीचे नियम यानंतर वेळोवेळी होणाऱ्या नियमातील बदलांच्या अधीन राहतील.

७) शासन निर्णय वित्त विभाग क्र.अंनियो १००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५ व क्र.अंनियो-२०१५/(NPS)/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.०६.०५.२०१५ व त्यामध्ये वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणांमधील तरतुदीनुसार १ नोव्हेंबर २००५ रोजी किंवा त्यानंतर ज्या अधिकारी/ कर्मचारी यांची शासकीय सेवेत नियुक्ती होईल त्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना (DCPS) म्हणजेच सध्याची राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना ( NPS ) लागू राहील. सध्या अस्तित्वात असलेली निवृत्तीवेतन योजना म्हणजेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण ) नियम १९८४ आणि सध्या अस्तित्वात असलेल्या सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना या उमेदवारांना लागू ठरणार नाही. मात्र उपरोक्त उमेदवारांपैकी जे शासकीय कर्मचारी १ नोव्हेंबर २००५ पूर्वी शासन सेवेत

निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असतील, त्यांना शासन परिपत्रक वित्त विभाग,क्र अनियो-१००६/८७/सेवा, दि.१२.०१.२००७ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागु राहतील.

८) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना दि. १४ जुलै,२०२१ तरतुदीनुसार गट-अ संवर्गात नियुक्त झालेल्या उमेदवारांना वाटप झालेल्या विभागीय संवर्गात किमान ३ वर्षे कालावधी पूर्ण करणे आवश्यक राहील.

९) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने ज्या उमेदवारांची शिफारस मागासवर्गीयांसाठी राखीव असलेल्या प्रवर्गातून झालेली आहे आणि ज्या उमेदवारांचे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या दिनांक ३ नोव्हेंबर, २०२३ च्या पत्रामधील सूचनेनुसार जाती/जमातीचे दावे तपासणीकरिता प्रलंबित आहेत, अशा उमेदवारांची नियुक्ती सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६ब, दि.१२ डिसेंबर, २०११ मधील तरतुदीनुसार सरळसेवा भरतीमध्ये ज्या उमेदवारांची निवड विशिष्ट मागास प्रवर्गासाठी आरक्षित असलेल्या जागांवर झालेली आहे व ज्यांनी नियुक्तीपुर्वी शासनाकडे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नाही, अशा उमेदवारांस त्यांच्या जात प्रमाणपत्राची वैधता तपासण्याच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे. नियुक्ती आदेश प्राप्त झाल्यानंतर अशा उमेदवाराने नियुक्ती आदेशाच्या दिनांकांपासून सहा महिन्याच्या आत आपल्या जात प्रमाणपत्रांची वैधता संबंधित जात पडताळणी समितीकडून करून घेणे आवश्यक राहील. सर्व संबंधित उमेदवारांनी नियुक्ती स्विकारताच जात वैधता तपासणी करण्यासाठी प्रस्ताव संबंधीत जात पडताळणी समितीकडे सादर करावा व जात पडताळणी समितीने दिलेल्या पोचपावतीची साक्षांकित प्रत नियुक्ती प्राधिकाऱ्यास सादर करावी. मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार, संबंधीत जात पडताळणी समितीने त्यांचे पडताळणी प्रस्ताव सहा महिन्यांच्या आत निकाली काढावेत. जात पडताळणी समितीने जात प्रमाणपत्र अवैध ठरविले, तर संबंधित उमेदवारास दिलेले नियुक्तीचे आदेश त्वरीत रद्द होतील, आणि त्या उमेदवाराविरुध्द नियुक्ती प्राधिकाऱ्याने महाराष्ट्र अनुसूचित जाती, अनुसुचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग (जातीचे प्रमाणपत्र देण्याचे व त्यांच्या पडताळणीचे विनियमन) अधिनियम, २००० यातील तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल. संबंधित उमेदवारांनी नियुक्तीच्या पदावर रुजू होताच जात वैधता तपासणीचा प्रस्ताव जात पडताळणी समितीकडे सादर करणे बंधनकारक राहील.

१०) महाराष्ट्र मत्स्यसेवेतील सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय/ प्रकल्प व्यवस्थापक, दापचरी गट-अ (तांत्रिक) (राजपत्रित) या पदावर नेमणूक करण्यात येणाऱ्या उमेदवारांचे चारित्र्य व पूर्वचारित्र्य यांची पडताळणी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२८.०८.२०१७ अन्वये करण्यात येत असल्याने सदरच्या शासन निर्णयातील तरतूदी सर्व उमेदवारांना लागू राहतील.

११) इतर मागासवर्गिय, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागाच्या दि.३१.०१.२०२० च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र राज्यातील इतर मागास प्रवर्ग विमुक्तजाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग तसेच शासन सेवेतील सरळ सेवा कोटयातील पदभरतीसाठी आरक्षणाची

टक्केवारी निश्चित करण्यात आलेल्या खुल्या प्रवर्गातील महिला, आर्थिकदृष्ट्या मागास प्रवर्गातील उमेदवार, एसईबीसी क्षेत्रातील आरक्षण धोरणानुसार आरक्षणाचा लाभ घेणारे मराठा समाजातील उमेदवार ईत्यादी यांना सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत देण्यात आलेल्या नॉन क्रिमिलेअर प्रमाणपत्राची (उत्पन्नाच्या प्रमाणपत्राची ) वैधता पडताळणीसाठी सक्षम यंत्रणा निर्माण करण्यात आली आहे. यास्तव, संबंधीत मागास प्रवर्गातील उमेदवारांचे **नॉन क्रिमिलेअर प्रमाणपत्र सक्षम प्राधिकरणाकडून प्रमाणित करुन येण्याच्या अधिन राहून सदरची नियुक्ती देण्यात येत आहे**. तरी उमेदवारांनी सादर केलेले नॉन क्रिमिलेअर प्रमाणपत्र रद्द झाल्यास सदरच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

१२) वरीलपैकी जे उमेदवार सेवेत हजर होतील त्यांचेबाबतचा अहवाल आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी शासनास तात्काळ सादर करावा.

१३) वरील उमेदवार ज्या दिवशी हजर होतील त्या दिनांकापासून नियमाप्रमाणे त्यांचे वार्षिक गोपनीय अहवाल वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयानुसार लिहिण्यात येतील.

१४) वरीलप्रमाणे नेमणूक झालेल्या उमेदवारांना वेळोवेळी शासन नियमानुसार सेवांतर्गत प्रशिक्षण कार्यक्रमास पाठविण्याबाबतची व्यवस्था आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी तात्काळ करावी.

१५) महाराष्ट्र मत्स्यसेवेतील सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय/ प्रकल्प व्यवस्थापक, दापचरी गट-अ (तांत्रिक) (राजपत्रित) या पदावरील नियुक्ती स्विकारण्यापूर्वीच्या शासकीय नोकरीचा राजीनामा किंवा कार्यमुक्ती आदेश हजर होणेचे वेळेस सादर करावा लागेल. अन्यथा सदर उमेदवारास महाराष्ट्र मत्स्यसेवेतील सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय/ प्रकल्प व्यवस्थापक, दापचरी गट-अ (तांत्रिक) (राजपत्रित) या पदावर हजर करुन घेण्यात येणार नाही. तसेच नियुक्तीपूर्वी शासकीय सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत त्यांच्याविरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही/ न्यायालयीन प्रकरणे सुरु अथवा प्रस्तावित नाही याबाबीच्या अधीन राहून नियुक्ती देण्यात येत आहे.

१६) या सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय/ प्रकल्प व्यवस्थापक, दापचरी गट-अ (तांत्रिक) (राजपत्रित) यांना नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवास भत्ता अनुज्ञेय होणार नाही.

१७) जर उमेदवार शासन सेवेतील सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय/ प्रकल्प व्यवस्थापक, दापचरी गट-अ (तांत्रिक) या पदावरील नेमणूकीसाठी सदर पदाच्या सेवा प्रवेश नियमातील तरतुदीप्रमाणे पात्र नव्हता अथवा विहीत अर्हता प्राप्त नव्हता अथवा त्यांनी नेमणुक मिळविण्यासाठी खोटी माहिती दिली होती अथवा खोटे प्रमाणपत्र सादर केले होते, असे नंतर आढळून आले, तर अशा उमेदवारांच्या सेवा सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्र. सीडीआर-१०९३/१०७७/प्र.क्र.२३/९३ अकरा, दिनांक १२.१०.१९९३ मधील तरतुदीनुसार समाप्त करण्यात येतील तसेच इतर अनुषंगिक कायदेशीर कार्यवाही करण्यात येईल.

१८) सदर नियुक्त्या शासनाच्या वेळोवेळी पारित होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहेत.

१९) उपरोक्त नमूद अटी व शर्तींचे तंतोतंत पालन करण्याची जबाबदारी आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील. तसेच उपरोक्त सर्व परिविक्षाधिन महाराष्ट्र मत्स्य सेवा गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांना सदर संवर्गाचे परीक्षा नियम, सेवा प्रवेश नियम तसेच इतर सर्व महत्वाचे सेवाविषयक नियम त्यांना ज्ञात करुन देण्याची कार्यवाही आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१११७४२३१४३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KISHOR MAHADEO JAKHATE

Digitally signed by KISHOR MAHADEO JAKHATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=83112e1445917d0a21fbab36d7c0ff41e09863c93a2e62ea1b0c01da16b7a161, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=032A6ACBFD529D66DD76E26EAB14B28C6DD07D2F776E529B44BA2CB45324C503, cn=KISHOR MAHADEO JAKHATE
Date: 2024.03.11 17:53:41 +05'30'

**( कि. म.जकाते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (मत्स्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा. विधानसभा सदस्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व मा. विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. अ. मु. स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अ.मु.स. (मत्स्य), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अ.मु.स. (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. मा. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, नवी मुंबई.
११. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई/नागपूर.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
१५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१६. प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय, सर्व
१७. संबंधित अधिकारी (आयुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई यांचेमार्फत)
१८. निवडनस्ती पदुम-१२.